महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : पिसंयो २००९/प्र.क्र.९३/९-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.
दिनांक २० जुलै, २००९.

वाचा:- १)आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२००९/प्र.क्र.११/का.७,दि.५ मे, २००९
२)वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण १००६/प्र.क्र.१३१/कोषा.प्रशासन-५, दि १५ मे, २००७
३) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र. १००८/प्र.क्र.८९/०९/२-(ए), दि.४ जून,२००९

प्रस्तावना:

राज्यात फळपिके तसेच भाजीपाला पिकांचे उत्पादन व दर्जाची वाढ करण्यावर भर देण्यात येत आहे. यासाठी विविध फळपिके /भाजीपाला पिकांवर पडणा-या कीड व रोग यावर त्वरीत नियंत्रण करणे आवश्यक असते. जेणेकरुन उत्पादनात होणारी घट टाळता येते. यासाठी राज्य पुरस्कृत पीक संरक्षण योजना राबविण्यात येत आहे. प्रस्तुत योजनेमध्ये सर्व फळपिके,भाजीपाला,फुलपिके,मसाला पिके, औषधी व सुगंधी वनस्पती या पिकांवर उद्‌भवणा-या किड/रोग नियंत्रणासाठी औषधांचे वाटप फवारणी कार्यक्रम ५०% अनुदानावर राबविण्यात येतो.

शासन निर्णय:

राज्य पुरस्कृत पीक संरक्षण योजना सन २००९-१० वर्षात राबविण्यास मान्यता देण्यात येत असून या योजनेअंतर्गत आदिवासी उपयोजनेंतर्गत रु.१.३० लाख (रुपये एक लाख तीस हजार लाख फक्त )एवढा निधी नासिक जिल्हयासाठी आदिवासी विकास विभागाने उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या वर्षी या योजनेंतर्गत सर्व फळपिके,भाजीपाला, फुलपिके,मसाला पिके, औषधी व सुगंधी वनस्पती या पिकावरील सर्व किड /रोग नियंत्रणासाठी औषधांचे वाटप ५० टक्के अनुदान तत्वावर हाती घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२.१ प्रस्तुत खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षातंर्गत खर्ची टाकून सन २००९-१० वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक टी-५
२४०१, पीक संवर्धन
पंचवार्षिक योजनांर्तगत योजना
७९६, जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना
राज्य योजनांतर्गत योजना
(०२) (०१) बागायत व भाजीपाला पिके योजना ( २४०१ २२१९ )
३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

२.२ या योजनेचा खर्च करण्यास संचालक फलोत्पादन , कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२.३ या योजनेच्या मार्गदर्शक सूचना प्रपत्र अ मध्ये देण्यात आल्या आहेत. नासिक जिल्हयाचा पीकसंरक्षण कार्यक्रम व हेक्टरी अनुदानाची मर्यादा इत्यादीबाबतच्या मार्गदर्शक सूचना, संचालक फलोत्पादन यांनी सर्व संबंधितांना निर्गमित कराव्यात.

२.४ वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ येथे उल्लेख केलेल्या परिपत्रकात तसेच कृषि व पदुम विभागच्या संदर्भाधीन क्र. ३ च्या शासननिर्णयातील सूचनांचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण -१००६/प्र.क्र.१३१/कोष-प्रशासन -५,दिनांक १५ मे,२००७ अन्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करुन प्रधान सचिव ( कृषि व फलो.) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २००९०७२०१५४५०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( स.ह. भोसले )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

प्रति,
आयुक्त कृषि ,महाराष्ट्र राज्य, पुणे.
व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, राजन हाऊस प्रभादेवी, मुंबई - २५.
व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य पणन महासंघ मर्या.कनमुर हाऊस ,नरसीनाथा स्ट्रीट , मुंबई - ९.
संचालक फलोत्पादन,कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
विभागीय कृषि सहसंचालक,नाशिक
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, नाशिक
कृषि विकास अधिकारी,जिल्हा परीषद , नाशिक
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा व परिक्षा ),महाराष्ट्र मुंबई / नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक
वित्त विभाग व्यय - १
आदिवासी विकास विभाग का.७
नियोजन विभाग, कार्यासन १४११
कक्ष अधिकारी २ अे ,१३ अे,कृषि व पदुम विभाग
ग्रंथपाल,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई ३२
निवडनस्ती

शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक पिसंयो २००९/प्र.क्र.९३/९अे, दि. २० जुलै २००९ चे सहपत्र

**प्रपत्र-अ**

सन २००९-१० या वर्षात सर्व फळपिके, भाजीपाला, फुलपिके, मसालापिके, औषधी व सुगंधी वनस्पतीवरील किड/रोग नियंत्रण योजना राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना

**१) लाभार्थींची निवड-**

या योजनेअंतर्गत लाभार्थी शक्यतो अल्प भूधारक/ सिमांतिक शेतकरी असावा. अनुसुचित जाती / जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ देण्यात येईल.

**२) अनुदान प्रमाण**

या योजनेतंर्गत पुरवावयाची किटकनाशके / बुरशीनाशके यांच्या एकूण किंमतीच्या ५० टक्के किंवा कमाल प्रपत्र-ब मध्ये निर्देश केल्याप्रमाणे खर्च लाभार्थी करील व उर्वरित ५० टक्के खर्च राज्य शासनाकडून अनुदानाच्या स्वरुपात करण्यात येईल.

**३) किटकनाशके / बुरशीनाशके यांची खरेदी**

या योजनेअंतर्गत किटकनाशके व बुरशीनाशके महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ यांच्याकडून खरेदी करण्यात येतील. संबंधीत किटकनाशके/बुरशीनाशके खरेदी करताना कृषि विभागाने शिफारस केलेली औषधेच खरेदी करण्यात येतील. औषधांची मागणी तांत्रिक नांवाने करावी, तसेच औषधांची खरेदी कृषि आयुक्तालयाने शिफारस केलेल्या दराने करण्यात यावी.

**४) मागणीचे निर्धारण**

शेतक-यांकडून मागणी गोळा करण्याची जबाबदारी कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील. कृषि विकास अधिकारी यांनी जिल्हयाची मागणी एकत्रित करुन पुरवठा संस्थेस नोंदवावी. औषधांची मागणी तांत्रिक नावाने नोंदविण्यात यावी, त्याची प्रत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक आणि कृषि आयुक्तालयास सादर करावी.

**५) औषधे पुरवठा**

कृषि विकास अधिकारी यांचे मागणी प्रमाणे महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने संबंधित जिल्हा परिषदांना गट पातळीपर्यत औषधाचा पुरवठा तात्काळ करावा. औषधांच्या वापराचा अंतिम दिनांक (एक्सपायरी डेट) ही पुरवठा केल्याच्या दिनांकापासून १ वर्षाच्या कालावधीपेक्षा कमी नाही, याची खात्री कृषि विकास अधिकारी यांनी करावी. प्रथम एकूण मागणीच्या २५ टक्के औषधांची उचल करावी. किटकनाशके/बुरशीनाशके यांचा पुरवठा, किड व रोगाचे नियंत्रण परिणामकारक होण्याच्या दृष्टीने एकाच वेळी केला जात आहे, याची खात्री करावी.

**६) वाहतुक व साठवण-**

जिल्हा परिषदांनी सदर साठयाची वाहतुक व साठवण पुरवठा संस्थेकडून गटपातळीपर्यत करुन घ्यावी.

**७)** **परवानापत्रक -**

गटविकास अधिका-यांच्या अखत्यारीतील ग्रामसेवकांनी शेतक-यांना गटविकास अधिका-याकडून किटकनाशके / बुरशीनाशके उपलब्ध होण्यासाठी परवाना पत्रे (परमीट) द्यावी. या परवाना पत्रामध्ये झाडांची संख्या, क्षेत्र, लागणारी किटकनाशके/ बुरशीनाशके यांचे प्रमाण, किंमती व अनुदान दर्शविण्यात यावे.

**८)** **औषधांचे दर -**

सन २००९-१० मध्ये सर्व फळपिके, भाजीपाला, फुलपिके, मसाला पिके, औषधी व सुगंधी वनस्पती या पिकावरील किड/रोग नियंत्रण योजनेअंतर्गत खरेदी करावयाच्या औषधाचे दर हे कृषि विभागाने निश्चित केलेल्या दराप्रमाणे राहतील.

**९)** **किटकनाशके/बुरशीनाशके यांची बिले अदा करण्याची पध्दतः-**

महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने जिल्हयांना औषधांचा पुरवठा केल्यानंतर कृषि विकास अधिकारी यांचेकडे औषधांची बिले पाठवतील. औषधे चांगल्या स्थितीत मिळाल्याबाबत साठा रजिस्टरमध्ये नोंद घेतल्याची, नमुने काढल्याची तसेच इतर आवश्यक ती प्रमाणपत्रे तयार करावीत. कृषि विकास अधिकारी यांनी औषधांची बिले प्राप्त झाल्यानंतर त्या बिलाची तपासणी करावी. महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाकडून प्राप्त झालेल्या बिलाच्या ५० टक्के अनुदानाची रक्कम २४०१ पीक संवर्धन या खालीलप्रमाणे लेखाशिर्षाच्या मंजूर अनुदानामधून अदा करावी.

**मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन**
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
७९६, जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना
राज्य योजनांतर्गत योजना
(०२) (०१) बागायती व भाजीपाला पिके योजना (२४०१ २२१९)
३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)

**१०)** **वसुलीबाबत-**

परवाना पत्रे मिळाल्यानंतर गट विकास अधिकारी यांनी किटकनाशकांची/ बुरशीनाशकाची ५० टक्के रक्कम शेतक-यांकडून औषध वाटपाचे वेळी वसूल करुन त्याचा भरणा कृषि विकास अधिकारी यांचेकडे करणेत यावा. कृषि विकास अधिकारी यांनी सदर वसूल केलेल्या ५० टक्के रक्कमेचा डिमांड ड्रॉफ्ट महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाचे नावाने काढून महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळास देण्यात यावा. शेतकयाकडून ५० टक्के रक्कम औषधे वाटप करतेवेळी वसूल करण्याची जबाबदारी कृषि विकास अधिकारी यांची राहील.

कृषि विकास अधिकारी यांनी औषध वापराचा सविस्तर तपशिल, आवश्यक प्रमाणपत्रे, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / विभागीय कृषि सहसंचालक यांचेकडे पाठवावीत. या योजनेतंर्गत खर्च झालेल्या

अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र मोहिम संपल्यानंतर एक महिन्यांच्या आंत कृषि विकास अधिकारी यांनी कृषि आयुक्तालयास सादर करावे, त्यासाठी वित्तीय वर्ष संपण्याची वाट पाहू नये.

**११) पाच टक्के सुट बाबत..**

महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाकडून जिल्हा परिषदांनी उचललेल्या किटकनाशकांचे/बुरशीनाशकांचे बिजक/देयक (इनव्हाईस) गोदामाच्या पावतीसह उपलब्ध झाल्यापासून संबधित कृषि विकास अधिकारी यांनी ३० दिवसांच्या आंत महामंडळास उपरोक्त मुद्या क्र. १० मध्ये दर्शविल्याप्रमाणे ५० टक्के रक्कम व शेतक-यांकडून वसूल झालेली ५० टक्के रक्कम अशी १०० टक्के रक्कम अदा केल्यास त्या देयकाच्या रक्कमेवर महामंडळाकडून ५ टक्के सुट देण्यांत येईल. (शासन निर्णय दि.१२ ऑगस्ट १९८१)

पिक संरक्षण मोहिमे नंतर शिल्लक राहिलेल्या औषधांचा साठा, औषधांचे पॅकिंग चांगल्या स्थितीत असेल, तर संबंधीत पुरवठा संस्थेत ती परत द्यावीत. त्याप्रमाणे जिल्हा परिषदांनी पिक संरक्षण मोहिम संपल्या बरोबर शिल्लक राहिलेल्या औषधांचा साठा सबंधित संस्थेकडे एक महिन्याच्या आंत परत करावा, तसे केल्याचे विभागीय कृषि सहसंचालक व कृषि आयुक्तालयास कळवावे. कृषि विकास अधिकारी यांनी परत केलेल्या औषधांची रक्कम त्वरीत संबंधित पुरवठा संस्थेकडून वसूल करावी व चलनाने शासकीय कोषागारात भरणा करावी.

**१२) आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत**

पिकसंरक्षण योजनेतंर्गत लेखाशिर्ष २४०१ लेखाशिर्षाच्या मंजूर तरतुदीमधून बिलाची ५० टक्के रक्कम तर शेतक-यांकडून वसूल झालेली ५० टक्के रक्कम अशी १०० टक्के रक्कम संबंधित एजन्सीला अदा करणेसाठी कृषि विकास अधिकारी यांना प्राधिकृत करणेत येत आहे. संबंधित जिल्ह्यांना मंजूर केलेला निधी मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद कोषागारातून काढुन जिल्हानिधीमध्ये ठेवतील. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद यांना आवश्यक तितका निधी वेळोवेळी जिल्हानिधीतून काढण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**१३) मुल्यमापन-**

पीक संरक्षण योजनेतंर्गत राबविण्यात येणा-या निरनिराळया मोहिमातील कामाचे मुल्यमापन कृषि विद्यापीठातील तज्ञांनी करावयाचे आहे. त्यासाठी लागणारी माहिती म्हणजेच लाभार्थीची गांववार यादी, क्षेत्र फवारणीकरिता वापरण्यात आलेली औषधे इत्यादी माहिती योग्य वेळी कृषि विद्यापीठातील संबंधित तज्ञांना पाठविण्याची व्यवस्था कृषि विकास अधिकारी यांनी करावी. त्याचप्रमाणे मुल्यमापन कामासाठी आवश्यक असेल तेव्हा संबंधित तज्ञांना वाहन उपलब्ध करुन देण्याबाबत आणि आवश्यक सहकार्य करण्याबाबत कार्यवाही करावी. यासाठी संबंधित कृषि विकास अधिकारी यांनी संशोधन संचालक, कृषि विद्यापीठ, यांचेकडे माहिती पाठविण्यात यावी. मुल्यमापनाचा अहवाल जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयामार्फत आयुक्तालयास सादर करण्यांत यावा.

**१४) प्रगती अहवाल-** राज्य पुरस्कृत पिक संरक्षण योजनेचा मासिक प्रगती अहवाल दरवर्षीप्रमाणे सोबत जोडलेल्या विहित प्रपत्रात प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यत कृषि आयुक्तालयास न चुकता पाठविण्याची व्यवस्था करावी.

**१५)** वितरीत केलेल्या औषधांचे लाभार्थी शेतकरी यांची गावनिहाय यादी करुन ग्रामपंचायतीकडे पाठविण्यात यावी व बैठकीत सादर करावी.

-------------